माऊंट एव्हरेस्ट शिखर मोहीम- २०१९
अंतर्गत “मिशन शौर्य- २” राबविण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्र. शाआशा-२०१८/प्र.क्र.३३१/का १३

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०३ नोव्हेंबर, २०१८

**वाचा-**

१) शासन निर्णय क्रमांकः टिएसपी-२०१७/प्र.क्र.२२०/कार्या-६ दि.१२.०९.२०१८
२) शासन निर्णय क्रमांकः बीयुडी- २०१८/प्र.क्र.१२२/कार्या-६ दि.२९.५.२०१८

**प्रस्तावना-**

व्यक्तीमत्व विकासासाठी आत्मविश्वास हा महत्वाचा घटक आहे व साहसी खेळातुन तो वृध्दींगत होण्यास मदत होते. या दृष्टीकोनातून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, चंद्रपुर व जिल्हाधिकारी, चंद्रपुर यांचे मार्फत माऊंट एव्हरेस्ट शिखर सर करण्यासाठी “मिशन शौर्य” ही मोहीम राबविण्यात आली. याअंतर्गत चंद्रपुर जिल्हयातील शासकीय आश्रमशाळांतील शारीरिकदृष्टया तंदुरूस्त व मानसिक दृष्टया कणखर अशा ५० विदयार्थ्यांची निवड करण्यात आली. या मोहिमेतंर्गत या विदयार्थ्यांना वर्षभर विविध ठिकाणी प्रशिक्षण देण्यात आले. मिशन शौर्य” अंतर्गत माऊंट एव्हरेस्ट शिखर सर करण्यासाठी शासकीय आदिवासी आश्रमशाळा बोर्डा, देवाडा व जिवती जि.चंद्रपूर येथील अंतीम निवड झालेले दहा विदयार्थी दि.१० एप्रिल, २०१८ रोजी मुंबई येथून शुभेच्छांसह रवाना झाले होते. सदर १० विद्यार्थ्यांपैकी ५ विद्यार्थ्यांनी दि.१६ मे, २०१८ रोजी एव्हरेस्ट शिखर सर करण्याची धाडसी मोहिम पुर्ण केलेली आहे. या यशस्वी झालेल्या मोहिमेमुळे आदिवासी समाजातील सर्व घटकांपर्यंत आत्मविश्वासाचा संदेश पोहोचला आहे. तसेच या मोहिमेमुळे राज्यभरातल्या आदिवासी विद्यार्थ्यांपुढे आदर्श निर्माण झालेला आहे. यामुळे भविष्यात देखिल शासकीय आश्रमशाळांमधील आदिवासी विद्यार्थ्यांना साहसी क्रीडा प्रकारातील खेळांकरीता प्रोत्साहन मिळणार आहे. सदर धाडसी मोहिम पुर्ण करून सदर विद्यार्थ्यांनी आदिवासी विकास विभागाच्या लौकीकात भर घातली आहे. तरी सदर यशाच्या गौरवार्थ विशेष बाब म्हणुन संबंधित विद्यार्थ्यांना व त्यांच्या कुटंबांना बक्षीस स्वरुपात लाभ देण्यात आले असून सदर विद्यार्थ्यांचा मा. राष्ट्रपती महोदय, मा. पंतप्रधान महोदय, मा. राज्यपाल महोदय, महाराष्ट्र राज्य, मा. मुख्यमंत्री महोदय, महाराष्ट्र राज्य यांच्या हस्ते गुणगौरव करण्यात आला असून आदिवासी विकास विभागाने राबविलेल्या

मिशन शौर्य या मोहिमेचे विशेष कौतुक करण्यात आले आहे. राज्यातील तसेच देश भरातील प्रसार माध्यमांनी देखील सदर मोहिमेची दखल घेऊन सदर मोहिमेबाबत गौरवपूर्ण प्रसिध्दी दिली आहे. मा. पंतप्रधान महोदयांनी त्यांची मन की बात या कार्यक्रमांमध्ये देशातील जनतेला संबोधताना मिशन शौर्य मोहिमेचे विशेषत्वाने उल्लेख करून याबाबत गौरव उद्‌गार व प्रशंसा केली आहे. तसेच मा. मुख्यमंत्री महोदय, महाराष्ट्र राज्य यांनी महाराष्ट्र राज्य यांनी मिशन शौर्य या मोहिमेचा धोरणात समावेश करावा असे सूचित केले आहे. यापूर्वी सन २०१८ साठी राबविण्यात आलेल्या मिशन शौर्य मोहिमेकरिता आदिवासी विकास विभागाने Transcend Adventures Pvt. Ltd तसेच Sky Walk Ventures Pvt. Ltd या दोन्हीही संस्थाची निवड केली होती. सदर संस्थापैकी Transcend Adventures Pvt. Ltd ही संस्था एव्हरेस्ट शिखर मोहिमांसाठी भारतातील एकमेव नोंदणीकृत संस्था असून त्यांना या क्षेत्रातील ८ वर्षाचा अनुभव आहे. जगातील सर्वात कमी वयाची एव्हरेस्ट शिखर सर करणारी मुलगी कु. मलावथ पुर्णा यामुलीस प्रशिक्षण देण्याचे काम नमूद संस्थेने केले आहे. तसेच Sky Walk Ventures Pvt. Ltd ही संस्था गिर्यारोहणामध्ये तज्ञ मार्गदर्शन करणारी तसेच प्रशिक्षण देणारी भारतातील नामवंत संस्था असून सदर संस्थेच्या संस्थापक यांना प्रशिक्षणाचा १० वर्षाचा अनुभव आहे. मिशन शौर्य २०१८ मध्ये त्यांनी सहभागी विद्यार्थ्यांना सदर मोहिमेच्या सुरूवातीपासून ते सदर मोहीम पूर्ण होण्याच्या कालावधीत प्रशिक्षण व तज्ञ मार्गदर्शन करून सदर मोहीम यशस्वी पार पाडण्यात महत्वाची भूमिका बजावली आहे. त्यामुळे सदर संस्थांचा याक्षेत्रातील विशेष अनुभवामुळे व प्रशिक्षणामुळे मिशन शौर्य २०१८ यशस्वीरित्या राबविण्यात आले आहे.

सबब, मिशन शौर्य २०१८ चे यश व त्यांची विद्यार्थ्यांचे मनोबल उंचविण्यातील महत्वाची भूमिका पाहता सन २०१९ या वर्षामध्ये एव्हरेस्ट शिखर सर करण्यासाठी मिशन शौर्य- २ ही मोहीम अधिक व्यापक प्रमाणात राबविण्यासाठी शासनाने मिशन शौर्य २०१८ मध्ये सहभागी तज्ञ संस्था Transcend Adventures Pvt. Ltd तसेच Sky Walk Ventures Pvt. Ltd या संस्थावर सन २०१९ साठीच्या मिशन शौर्य-२०१९ मोहिमेची जबाबदारी सोपविण्याचे ठरविले असून त्याअनुषंगाने सदर संस्थांबरोबर मा. मुख्यमंत्री महोदयांच्या उपस्थितीत सांमजस्य करार केला आहे. त्यानूसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय-**

१. सन २०१९ या वर्षासाठी एव्हरेस्ट शिखर सर करण्यासाठी आदिवासी शासकीय आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना पाठविण्यासाठी "मिशन शौर्य-२" ही मोहीम राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. "मिशन शौर्य-२" मोहिमेसाठी Transcend Adventures Pvt. Ltd तसेच Sky Walk Ventures Pvt. Ltd या संस्थाची निवड करण्यात येत आहे.

३. सांमजस्य करारानूसार मिशन शौर्य-२ या मोहिमेसाठी Transcend Adventures Pvt. Ltd तसेच Sky Walk Ventures Pvt. Ltd या संस्थाची जबाबदारी व भूमिका खालीलप्रमाणे राहील.

(१) Sky Walk Ventures Pvt. Ltd :-

सदर संस्था मिशन शौर्य-२ एव्हरेस्ट मोहीम २०१९ साठी सल्ला व तांत्रिक पर्यवेक्षणाची जबाबदारी विभागाच्या वतीने पार पाडेल. यात प्रामुख्याने खालील बाबींचा समावेश असेल.

i. सर्व अपर आयुक्तांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळांमधून सदर मोहिमेसाठी विद्यार्थ्यांची निवड करणे, सदर निवडीसाठी मार्गदर्शक सुचना ठरविणे, निवडीची पात्रता ठरविणे तसेच प्रत्येक टप्प्यावरील निवड चाचणीसाठी मार्गदर्शन करणे.

ii. सदर मोहिमेसाठी निवड करण्यात आलेल्या २०० विद्यार्थ्यांना ३ टप्प्यात प्रशिक्षण देतील. सदर प्रशिक्षणासाठी नेतृत्व व कौशल्य विकासाचा प्रशिक्षण कार्यक्रम ज्ञानभारती कौशल्य विकास केंद्र, मदन डॅम, वर्धा येथे आयोजित करणे व त्यासाठी आवश्यक ते प्रशिक्षण साहित्य पुरविणे.

iii. सदर मोहिमेसाठी राबविण्यात येणाऱ्या निवड प्रक्रिया व प्रशिक्षणाचे संनियंत्रण करणे.

iv. मिशन मौर्य-२ या मोहिमेसाठी देण्यात येणाऱ्या प्रशिक्षणाच्या स्थळांच्या ठिकाणी संरक्षण तथा पर्यवेक्षणासाठी आवश्यक त्या मनुष्यबळाची नेमणूक करणे. उदा. भोगीर, HMI, दार्जिलिंग इ. ठिकाणी देण्यात येणारे प्रगत प्रशिक्षण.

v. लेह येथील शीतकालीन प्रशिक्षण शिबीरासाठी वैयक्तिक पर्यवेक्षण आणि सहाय्य.

vi. सदर प्रशिक्षणासाठी आवश्यक मार्गदर्शन प्रशिक्षण आणि प्रशासकीय सहाय्य इत्यादी सदर संस्था पुरविले. उदा. पोषक आहार, Diet Chart, शाररीक व्यायम वेळापत्रक इत्यादी.

vii. सदर मोहिमेनंतर मोहिमेत सहभागी झालेल्या विद्यार्थ्यांना त्यांच्या भविष्यात कारकीर्दसाठी व्यवसायीक संधीच्या अनुषंगाने मार्गदर्शन करणे व त्यांची गुणवत्ता जोपासणे.

(२) Transcend Adventures Pvt. Ltd :-

सदर संस्था या मोहिमेत सहभागी विद्यार्थ्यांना गिर्यारोहणाचे व्यवसायिक प्रशिक्षण देणे आणि सदर मोहिमेसाठी आवश्यक असणाऱ्या सर्व प्रकारचे साहित्य पुरविण्यास जबाबदार असेल. तसेच त्याअनुषंगाने सदर संस्था खालीलप्रमाणे कार्यवाही करेल.

i. मांऊट एव्हरेस्ट शिखर सर करण्यासाठी घेण्यात येणाऱ्या शीत कालीन प्रशिक्षणासाठी विद्यार्थ्यांची निवड करणे व त्यांना प्रशिक्षण देणे.

ii. शीतकालीन प्रशिक्षणासाठी आवश्यक निवास व्यवस्था, सर्व प्रकारचे साहित्य व प्रशिक्षण सुविधा पुरविणे.

iii. सदर प्रशिक्षणामधून मांऊट एव्हरेस्ट शिखर सर करण्यासाठी सुयोग्य विद्यार्थ्यांची निवड करणे.

iv. मांऊट एव्हरेस्ट सर करण्यासाठी निवड झालेल्या विद्यार्थ्यांना मुंबई येथून मांऊट एव्हरेस्ट शिखरा पर्यंत नेणे तसेच मोहीम पूर्ण झाल्यावर त्यांना परत मुंबई येथे आणण्याची जबाबदारी सदर संस्थेची राहील.

v. सदर मोहिमेदरम्यान तज्ञ डॉक्टरांची नेमणूक करणे.

vi. सदर मोहिमेदरम्यान उत्तम कामगिरी असलेल्या शेर्पांची नेमणूक करणे.

vii. सदर मोहिमतील सर्व विद्यार्थ्यांचे अरोग्य, सुरक्षा, संरक्षण आणि विमा काढणे यांची जबाबदारी संस्थेची राहील.

## ४. आदिवासी विकास विभागाने करावयाची जबाबदारी :-

(१) सदर कार्यक्रमाचे समन्वय अपर आयुक्त, नागपूर हे करतील. त्यांना सदर कार्यक्रमात भाग घेण्याऱ्या विद्यार्थ्यांचे भोजन, साहित्य व अन्य सुविधांसाठी आवश्यक तो सर्व खर्च करण्याचे अधिकार राहतील.

(२) सन २०१९ साठीच्या “मिशन शौर्य -२” मोहिमेच्या समन्वयासाठी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या स्तरावर खालीलप्रमाणे **सुकाणू समिती** तयार करणे:-

| | | |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक | सदस्य सचिव |
| ३ | अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक | सदस्य |
| ४ | अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे | सदस्य |
| ५ | अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती | सदस्य |
| ६ | अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर | सदस्य |
| ७ | प्रतिनिधी, Sky Walk Ventures Pvt. Ltd | सदस्य |
| ८ | प्रतिनिधी, Transcend Adventures Pvt. Ltd | सदस्य |

उपरोक्त नमूद “सुकाणू समिती” सदर मोहिमेचे नियोजन करणाऱ्या/प्रशिक्षण देणाऱ्या संस्थासोबत सदर मोहिमेच्या यशस्वी अंमलबजावणीसाठी सदर मोहिमे दरम्यान येणाऱ्या अडचणी सोडविण्यासाठी आवश्यक तो समन्वय साधुन त्याबाबत आवश्यकते नूसार वेळोवेळी बैठका घेऊन निर्णय घेतील. तसेच सदर मोहीमे दरम्यान नैसर्गिक/मानव निर्मित आपत्ती उद्भवल्यास किंवा इतर कुठल्याही अपरीहार्य कारणांमुळे सदर मोहीम रद्द करणे अथवा स्थगित करणे याबाबतचे अधिकार सदर समितीस राहातील.

(३) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक हे सदर मोहिमेच्या अंमलबजाणीसाठी नियंत्रण अधिकारी असतील. त्याअनुषंगाने सदर मोहिमासाठी कार्यरंभ आदेश काढणे,

याबाबत आवश्यक ते पत्र व्यवहार करणे व समन्वय साधणे या बाबी ते पार पाडतील व सदर मोहिमेच्या प्रत्येक टप्प्यावरील कार्यवाहीची माहिती वेळोवेळी शासनास सादर करतील.

(४) सदर मोहिमेच्या संनियत्रणासाठी एक कार्यकारी समिती कार्यरत राहील. सदर समितीची रचना खालीलप्रमाणे असेल..

| | | |
|---|---|---|
| १ | अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर | अध्यक्ष |
| २ | अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती | सदस्य |
| ३ | अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे | सदस्य |
| ४ | अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक | सदस्य |
| ५ | ज्या प्रकल्प अधिकाऱ्यांच्या कार्यक्षेत्रातील विद्यार्थी या मोहिमेत सहभागी असतील ते सर्व प्रकल्प अधिकारी | सदस्य |

उपरोक्त कार्यकारी समिती सदर मोहिमेच्या प्रत्यक्ष अंमलबजावणीचे संनियत्रण जबाबदार असेल.

**५.** आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी सदर मोहिसाठी येणारा खर्चासाठी हा प्रशिक्षणानूसार टप्प्या टप्प्याने सदर संबंधित प्रशिक्षण संस्थांना वाटप करावा. तसेच मांऊट एव्हरेस्ट सर करतेवेळी शेवटच्या टप्पातील येणाऱ्या खर्चापैकी ८५ टक्के रक्कम संबंधित संस्थेच्या खात्यावर जमा करावी व उर्वरित रक्कम सदर मोहीम संपल्यानंतर अदा करण्यात यावी. तसेच आवश्यक निधी अपर आयुक्त, नागपूर यांना वितरीत करावा.

**६.** सदर "मिशन शौर्य -२" या मोहिमेसाठी सर्वसाधारण **विववरणपत्र अ** मध्ये दर्शविल्याप्रमाणे रू.६,१९,९८,८२९/- (जीएसटी सह) इतका खर्चास मान्यता देण्यात येत असून सदरचा खर्च सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाच्या आश्रमशाळा समुह ( २२२५ डी ७३४) या लेखाशीर्षाखालील ५०-इतर खर्च या बाबीखालील तरतूदीतून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०३१८०४४५२८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2018.11.03 18:11:09 +05'30'

**( सु. ना. शिंदे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री ( आदिवासी विकास) यांचे खासगी सचिव, मंत्रालय ,मुंबई
२. मा. राज्यमंत्री ( आदिवासी विकास) यांचे खासगी सचिव , मंत्रालय ,मुंबई
३. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय ,मुंबई
४. आयुक्त, आदिवासी विकास , नाशिक
५. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपुर /अमरावती /ठाणे /नाशिक
७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
८. महालेखापाल (लेखापरिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपुर
९. सर्व सह सचिव/ उप सचिव आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.सर्व अवर सचिव / कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय , मुंबई.
११.निवड नस्ती (का-१३).

| अ क्र. | विवरण | विद्यार्थी संख्या | प्रति विद्यार्थी खर्च | रक्कम | GST दर | GST रक्कम | एकूण रक्कम | यासाठी अदा करण्यात यावी | या तारखेपर्यंत अदा करण्यात यावी. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| विवरणपत्र (अ) | | | | | | | | | |
| मिशन शौर्य २ (माउंट एव्हरेस्ट २०१९) | | | | | | | | | |
| १ | वर्धा येथील प्रशिक्षण केंद्रात चार विभागांच्या विद्यार्थ्यांचे प्रशिक्षण आणि निवड (५ दिवस) | २०० | ७,५००.०० | १५,००,०००.०० | १८% | २,७०,०००.०० | १७,७०,०००.१८ | स्कायवॉक व्हेंचर्स | दि.३०/८/२०१८ |
| | प्रत्येक विद्यार्थ्याला वैयक्तिक साहित्य (Personal Kit ) | २०० | ३,०००.०० | ६,००,०००.०० | १८% | १,०८,०००.०० | ७,०८,०००.१८ | स्कायवॉक व्हेंचर्स | |
| २ | निवडलेल्या विद्यार्थ्यांचे भोंगीर(at RCSB ) येथे प्रशिक्षण **(५ दिवस)** | १६० | ६,६२०.०० | १०,५९,२००.०० | | | १०,५९,२००.०० | AAT भोंगीर | दि.८/९/२०१८ |
| | वर्धा ते भोंगीर जाण्या-येण्याचा प्रवास | १६० | १,०८०.०० | १,७२,८००.०० | | | १,७२,८००.०० | रेल्वे तिकीट | |
| ३ | दार्जिलिंग (at HMI) येथे प्रशिक्षणासाठी पाठवणे **(२५ दिवस)** | ४० | ५८,८००.०० | २३,५२,०००.०० | | | २३,५२,०००.०० | HMI, Darjeeling | दि.१५/१०/२०१८ |
| ४ | संपूर्ण गटाला एकाठिकाणी शारीरिक क्षमता विकास आणि तयारीसाठी | ३० | Lumpsum | ४,००,०००.०० | | | ४,००,०००.०० | स्कायवॉक व्हेंचर्स | दि.२०/११/२०१८ |
| ५ | अत्याधुनिक पर्वतारोहण कोर्स at Institute Indian Himalayan Center For Adventure and Ecotourism Government of Sikkim. **(२० दिवस)** | ३० | ३८,८००.०० | ११,६४,०००.०० | | | ११,६४,०००.०० | Indian Himalayan Center For Adventure and Ecotourism Government of Sikkim व स्कायवॉक व्हेंचर्स | दि.१५/११/२०१८ |
| ६ | संपूर्ण गटाला एकाठिकाणी शारीरिक क्षमता विकास आणि तयारीसाठी | २० | Lumpsum | ३,००,०००.०० | | | ३,००,०००.०० | ए.आ. वि. प्र | |
| ७ | लेह येथील हिवाळी प्रशिक्षणासाठी **(१० दिवस)** | २० | १,५०,६००.०० | ३०,१२,०००.०० | ५% | १,५०,६००.०० | ३१,६२,६००.०५ | ट्रान्सकॅन्ड एडव्हेंचर्स | दि.२०/१/२०१९ |
| ८ | वर्धा येथे शारीरिक क्षमता विकास आणि तयारीसाठी तसेच १३ विद्यार्थ्यांना गिर्यारोहणाचे खास प्रशिक्षण | १३ | Lumpsum | ३,००,०००.०० | १८% | ५४,०००.०० | ३,५४,०००.१८ | स्कायवॉक व्हेंचर्स | |
| ९ | माउंट एव्हरेस्ट चढाई मोहिमेस सुरवात १५ गिर्यारोहक, २० शेर्पा,१ बेस कॅम्प व्यवस्थापक, १ डॉक्टर आणि सल्लागार. | | | ४,४५,३४,९३०.०० | ५% | २२,२६,७४६.५० | ४,६७,६१,६७६.५५ | ट्रान्सकॅन्ड एडव्हेंचर्स | दि.७/४/२०१९ ते दि.३०/५/२०१९ |
| १० | टप्पा १ ते ८ पर्यंत तसेच एव्हरेस्ट बेस कॅम्प पर्यंत चलचित्र चित्रित करण्यासाठी एक छायाचित्रकार, गटा सोबत प्रशिक्षण स्थळी जाण्यायेण्याच्या खर्चा सह | | | ११,५६,४००.०० | १८% | २,०८,१५२.०० | १३,६४,५५२.१८ | छायाचित्रकार, चलचित्रकार आणि ट्रान्सकॅन्ड एडव्हेंचर्स | |
| ११ | सल्लागार निरीक्षण शुल्क संपूर्ण प्रकल्प समन्वय (सामंजस्य करारानुसार) - स्काय वॉक व्हेंचर्स प्रा.ली. | | Lumpsum | १८,००,०००.०० | १८% | ३,२४,०००.०० | २१,२४,०००.१८ | स्कायवॉक व्हेंचर्स | |
| १२ | अधिकची GST रक्कम लागू | | | | | | | | |
| | **एकूण रक्कम** | | | ५,८३,५१,३३०.०० | | ३३,४१,४९८.५० | ६,१६,९२,८२९.५० | | |
| | ३ गिर्यारोहकांना लागणारी उपकरणे आपल्याकडे असल्याने त्याची रक्कम कमी | | | -५,२५,०००.०० | | | | पूर्वीचे ३ गिर्यारोहक | |
| | **अंतिम प्रकल्प रक्कम** | | | ५,७८,२६,३३०.०० | | ३३,४१,४९८.५० | ६,१६,९२,८२९.५० | | |